**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**क्रमांकः असप्र-१२२४/प्र.क्र.२४/प्रशा-१ (का.१४)**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा रोड
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: २२ मे, २०२४

**आदेश**

श्रीमती वंदना पुनमचंद जैन, अवर सचिव, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग यांची महिला व बाल विकास विभागाच्या अधिपत्याखालील राज्य बाल हक्क संरक्षण आयोग, वरळी या कार्यालयातील **“प्रशासकीय अधिकारी”** या पदावर प्रथमत: दोन वर्षांच्या कालावधीसाठी खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात येत आहे:-

अ) श्रीमती जैन, अवर सचिव ह्या ज्या तारखेला प्रतिनियुक्तीच्या पदावर रूजू होतील त्या तारखेपासून प्रतिनियुक्तीच्या सेवेचा प्रारंभ होईल आणि ती सेवा ज्या तारखेला त्या आपल्या शासकीय पदाचा कार्यभार पुन्हा स्वीकारतील त्या तारखेला समाप्त होईल.

ब) जर त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने शासनाला आवश्यक वाटली तर प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही वेळी त्यांना परत बोलावून घेण्याचा अधिकार शासन/सक्षम प्राधिकाऱ्यास राहील.

क) जर त्यांची सेवा स्वीयेतर नियोक्त्याला आवश्यक वाटली नाही तर त्यांना मूळ विभागाकडे परत पाठविण्याची मुभा स्वीयेतर नियोक्त्याला राहील. मात्र, याप्रमाणे परत पाठविण्यापूर्वी स्वीयेतर नियोक्त्याने शासनाला/सक्षम प्राधिकाऱ्याला तीन महिन्यांची नोटीस दिली पाहिजे; आणि

ड) त्यांनी मूळ विभागाकडे परत जाण्याचा आपला उद्देश आहे, अशी कमीत कमी तीन महिन्यांची लेखी नोटीस शासनाला / सक्षम प्राधिकाऱ्याला दिल्यानंतर त्यांना मूळ विभागाकडे परत येण्याची मुभा राहील.

३. महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा... इ.) नियम १९८१ मधील नियम ४० (परिशिष्ट दोन) मधील तरतुदी विचारात घेऊन सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग व महिला व बाल विकास विभागाने श्रीमती जैन, अवर सचिव यांच्या प्रतिनियुक्तीबाबतच्या अटी व शर्ती आपापसात ठरवाव्यात.

४. श्रीमती वंदना पुनमचंद जैन, अवर सचिव यांच्या इतर सर्व प्रशासकीय बाबी सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागामार्फत हाताळण्यात येतील.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०५२२१८३१२९४८०७ हा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VINAYAK BABURAO MANE

Digitally signed by VINAYAK BABURAO MANE
Date: 2024.05.22 18:44:23 +05'30'

**( वि.बा.माने )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
२. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई

३. सह सचिव/उप सचिव (आस्थापना), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
४. सह सचिव/उप सचिव (आस्थापना), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
५. सचिव, राज्य बाल हक्क संरक्षण आयोग, वरळी, मुंबई
६. श्रीमती वंदना पुनमचंद जैन, अवर सचिव, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
७. प्रशा-१ (कार्या.१४) संग्रहार्थ